**भुपृष्ठावरील पाण्याचे उपलब्धतेची अचूक माहिती मिळविण्यासाठी जागतिक बँकेकडून मिळणा-या अर्थसहाय्यीत जलविज्ञान प्रकल्पाच्या टप्पा-२ मधील कामास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग**

**शासन निर्णय क्र.जविप्र २००५/२८१/(१३८/०५)/जसंनि**
**मंत्रालय मुंबई- ४०० ०३२.**
**दिनांक २५/१०/२००५**

**संदर्भ** १. महाराष्ट्र शासन, पाटबंधारे विभाग, शासन निर्णय क्रमांक- एनएचपी-१०९३/(६५/९२) जसंनि दिनांक २२ नोव्हेंबर, १९९५.

२. महाराष्ट्र शासन, पाटबंधारे विभाग, शासन निर्णय क्रमांक- एनएचपी-१०९९/(९३/९९) भाग १ जसंनि दिनांक १६ मे,२०००.

३. महाराष्ट्र शासन, पाटबंधारे विभाग, शासन निर्णय क्रमांक- एनएचपी-१०९९/(९३/९९) भाग ३ जसंनि, दिनांक ११/१२/२००२.

४. महाराष्ट्र शासन, पाटबंधारे विभाग, शासन निर्णय क्रमांक-एपीएस-१०७३/३२६५-३-ए (३) दिनांक १७/७/१९७४.

५. मु.अ.जलविज्ञान प्रकल्प, नाशिक यांचे पत्र क्र. एचपी-२/तां.शा-१/(१२१/२००५)/८८४, दि. ६/४/२००५ व दि. १७.८.२००५ चे पत्र.

**प्रस्तावना**

भुपृष्ठावरील पाण्याच्या उपलब्धतेची अचूक माहिती मिळविण्यासाठी जागतिक बँकेकडून अर्थसहाय्य मिळविण्याकरिता जागतिक बँकेबरोबर माहे सप्टे.१९९५ मध्ये करारनाम्यावर स्वाक्षऱ्या करण्यात आल्या होत्या. करारनाम्यानुसार जागतिक बँकेकडून मिळणारे अर्थसहाय्याच्या मदतीने जलविज्ञान प्रकल्पाचे टप्पा-१ मधील कामे सुरुवातीस ६ वर्षांत पूर्ण करण्याचे ठरले होते. तदनंतर जागतिक बँकेने जलविज्ञान प्रकल्पाचे टप्पा-१ मधील कामे पूर्ण करण्यास डिसेंबर २००३ पर्यंत मुदतवाढ दिलेली होती. सदरहू करारनाम्यानुसार जागतिक बँकेकडून सुरुवातीस रु.३१.४२ कोटी इतक्या रकमेचे अर्थसहाय्य मिळण्यास संदर्भ क्र. १ च्या शासन निर्णयानुसार प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. करारनाम्याप्रमाणे जागतिक बँकेकडून मिळणारे अर्थसहाय्य तदनंतर जागतिक बँकेने जलविज्ञान प्रकल्पाच्या कामामध्ये विविध प्रकारचे नवीन यंत्रणा व उपकरणे बसविण्यास सुचविल्याप्रमाणे जलविज्ञान

सांकेतांक क्र. 201412151510074327

प्रकल्पाच्या टप्पा-१ मधील कामास संदर्भिय शासन निर्णय क्र. [illegible] अन्वये [illegible] रु. ८६.३८ कोटी व रु. ६०.४१ कोटी इतक्या रकमेस द्वितीय सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती.

सदरहू अंदाजपत्रकामध्ये प्रामुख्याने खालील बाबींचा अंतर्भाव करण्यात आला होता.

1) Installation of New & Upgradation of GD stations;-55 Nos.
2) Installation of 18 New Full Climate stations.
3) New Administrative Building @ Nashik & Office Buildings @Nagpur, Aurangabad.
4) Provision of construction of 315 Quarters @ Gauge sites.
5) Procurement of 85 Computers.
6) Procurement of 6 Boats.
7) Procurement Bathymatric Equipment for Reservoir Sedimentation Survey.
8) Provision of 5 WQ level II labs.
9) Provision for additional amenities such as ESR, Pipe line, Garden etc. to the Administrative building @ Nashik.
10) Provision made newly for modification of existing store shed for storing bathymetric equipment @ MERI Nashik.

उपरोक्त परिच्छेदामध्ये विशद केल्याप्रमाणे जलविज्ञान प्रकल्प टप्पा-१ मधील कामे विहीत मुदतीत पूर्ण करण्यात आलेली आहेत. त्यावर डिसेंबर २००३ अखेर रु. ६३ कोटी इतका खर्च झालेला असून जागतिक बँकेकडून शासनास रु. ४२.२७ कोटी इतक्या रकमेची प्रतिपूर्ती प्राप्त झालेली आहे. अशा तऱ्हेने जागतिक बँकेच्या मदतीखाली असलेल्या जलविज्ञान प्रकल्पाच्या टप्पा-१ मधील कामे पूर्ण करण्यात आली आहेत. टप्पा-१ मधील कामाकरिता अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता नियोजन व वित्त विभागाची मान्यता घेऊन प्रदान करण्यात आली आहे.

नजिकच्या काळात जलविज्ञान प्रकल्पाच्या टप्पा-२ च्या कामास जागतिक बँकेकडून अर्थसहाय्य मिळणार असून त्याची अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणे अपेक्षित आहे. जलविज्ञान प्रकल्पाच्या टप्पा-२ करिता अंदाजपत्रकामध्ये खालील बाबींचा समावेश करण्यात आला आहे.

| | | |
|---|---|---|
| 1) | Consolidation of HP I Activities:- | Rs.0.80 Crores |
| 2) | Awareness dissemination & Knowledge sharing:- | Rs. 1.72Crores |
| 3) | Implementation Support:- | Rs.2.32 Crores. |
| 4) | Hydrological Design Aids:- | Rs.0.29 Crores |
| 5) | Decision Support System:- | Rs.3.77 Crores. |
| 6) | Purpose Driven Studies:- | Rs.0.76 Crores. |

Total Rs.9.8076 Crores.(Capital+Recurrent)

जागतिक बँकेकडून टप्पा-२ मधील कामाकरिता वर नमूद केल्याप्रमाणे रु. ९.८२ कोटी इतक्या रकमेचे अर्थसहाय्य मिळणार असून सुमारे ८.०९ कोटी रकमेची प्रतिपूर्ती मिळणार आहे. सदर प्रकल्प ६ वर्षांच्या कालावधीत पूर्ण करावयाचा असून प्रतिवर्षी या प्रकल्पावर (टप्पा-२ मधील ) रु. १.५० कोटी इतका खर्च अपेक्षित आहे. जलविज्ञान प्रकल्पाच्या टप्पा-२ मधील कामाकरिता रु. १.३२५ कोटी इतक्या रकमेची तरतूद आर्थिक वर्ष २००५-०६ साठी करण्यात आली आहे.

## शासन निर्णय

जलविज्ञान प्रकल्पांतर्गत टप्पा- १ मधील कामावर डिसेंबर २००३ अखेर रुपये ६३.०० कोटी एवढा खर्च झाला असून जागतिक बँकेकडून रु. ४२.२७ कोटी एवढया रकमेची प्रतिपूर्ती प्राप्त झालेली आहे. जागतिक बँकेबरोबर वेळोवेळी झालेल्या वाटाघाटीमध्ये ठरल्याप्रमाणे जागतिक बँकेने जलविज्ञान प्रकल्पाच्या टप्पा-२ मधील कामाकरिता रु. ९.८२ कोटी इतक्या रकमेस अर्थसहाय्य देण्यास मान्य केले आहे. जलविज्ञान प्रकल्पांतर्गत टप्पा-२ मधील कामे ६ वर्षांच्या कालावधीत पूर्ण करावयाचे असून, त्याबाबत सविस्तर माहिती प्रस्तावना मध्ये दर्शविण्यात आली आहे.

तरी जागतिक बँकेच्या मदतीखाली असलेल्या जलविज्ञान प्रकल्पाच्या टप्पा-२ मधील कामाच्या रु. ९.८२ कोटी इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

या प्रकल्पावर होणारा खर्च मागणी क्र. आय-२, २७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे-८०-सर्वसाधारण (००२) आधार सामग्री गोळा करणे (०४) बांधकामे (०४) (०३) अधीक्षक अभियंता, आधार सामुग्री संकलन मंडळ, नाशिक (२७०१ ८९९१ ) (योजनांतर्गत) या लेखाशीर्षाखाली टाकावा व त्यामधील खर्च मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

हा निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २७५८/नियो, दि. २२.६.२००५ आणि वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक- ५८०/०५/व्यय-१२, दि.१९.९.२००५ अन्वये वित्त विभाग यांच्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

**सहपत्र- प्रपत्र- अ**

(अ.अ.सबनीस)
शासनाचे अवर सचिव.

प्रत सहपत्रासह

वित्त विभाग, (व्यय-१२) मंत्रालय, मुंबई
नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
महालेखापाल महाराष्ट्र राज्य, (लेखा परिक्षा) १/२ मुंबई/नागपूर
महालेखापाल महाराष्ट्र राज्य, (लेखा अनुज्ञेयता) १/२ मुंबई/नागपूर
महासंचालक, माहिती व प्रसिध्दी संचनालय, मंत्रालय, मुंबई.
मुख्य अभियंता, जलविज्ञान प्रकल्प, नाशिक.
अधीक्षक अभियंता, आधार सामुग्री संकलन मंडळ, नाशिक.
अधीक्षक अभियंता, आधार सामुग्री पृथ्थ:करण मंडळ, नाशिक.
आंतरवित्त सल्लागार व उप सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
सर्व अधिक्षक अभियंता व पदसिध्द उप सचिव जलसंपदा विभाग, मंत्रालय मुंबई.
अवर सचिव (जसनि), जलसंपदा विभाग, मंत्रालय मुंबई.
अवर सचिव अर्थसंकल्प (१) ३ प्रती, जलसंपदा विभाग, मंत्रालय मुंबई.
जसनि कार्यासन (संग्रहार्थ).

## Annexure I (प्रपत्र-अ)

Name of works:- Hydrology Project.

Rs. in '000

| S.N. | Type of Estimate | Amount. |
|---|---|---|
| 1) | Sub – estimate No.1 Civil Works. | 13795 |
| 2) | Sub – estimate No.2 Training. | 18380 |
| 3) | Sub – estimate No.3 Equipment. | 34857 |
| 4) | Sub – estimate No.4 Recurrent. | 28937 |
| 5) | Sub – estimate No. 5 Publication | 1224 |
| 6) | Sub – estimate No. 6 Consultancy. | 1098 |
| | Total Cost of the project. | 98291 |